**भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील सहसंचालक संवर्गातील अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आपना-०२२०/प्र.क्र.६६/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- ४०० ००१.
तारीख: २९ जून, २०२०.

**वाचा :-**

१) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः** परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६.

२) **शासन आदेश, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** आपना-२०१६/प्र.क्र.१५०/पापु-१५, दिनांक ०७ ऑगस्ट, २०१७.

३) **संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचे पत्र क्रमांकः** प्रशासन/ आस्था १/ परि.काला.समा/सभूवै/प्र.क्र.२४१/१६२/२०२०, दिनांक ०४ मार्च, २०२०.

**प्रस्तावना :-**

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील “सहसंचालक” या पदावर संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन आदेशान्वये दोन वर्षांच्या परीविक्षा कालावधीकरीता श्री.सतीश डी. उमरीकर यांची नियुक्ती करण्यात आली होती. ही नियुक्ती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने केलेल्या शिफारशीनुसार “सहसंचालक” या पदावर शासन सेवेत प्रथम नियुक्तीने करण्यात आली होती.

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये शासन सेवेतील अधिकारी/ कर्मचारी यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत सुधारित मार्गदर्शक सूचना पारित करण्यात आल्या असून सहसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा या पदावर पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांचा २ वर्षांचा परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केलेला असल्याने व तशी शिफारस संचालनालयाने संदर्भाधीन क्रमांक ३ येथील पत्रान्वये केलेली असल्याने श्री.सतीश उमरीकर यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करून त्यांना नियमित “सहसंचालक” म्हणून स्थानापन्न नियुक्ती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील श्री.सतिश डी. उमरीकर "सहसंचालक" यांनी त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबी समाधानकारकरित्या पूर्ण केलेल्या असल्याने स्तंभ क्रमांक ५ मध्ये दर्शविलेल्या दिनांकापासून त्यांचा परीविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यास व त्यांच्या पुढील वेतनवाढी मुक्त करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | परिविक्षाधीन सहसंचालक यांचे नाव | सहसंचालक पदावर रुजू झाल्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधीत घेतलेल्या रजा | परिविक्षाधीन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक | सहसंचालक पदावरील सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री. सतीश देविदासराव उमरीकर | ०७/०८/२०१७ | ८६ दिवस | ३१/१०/२०१९ | ०१/११/२०१९ |

संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना कळविण्यात येते की, उक्त सहसंचालक यांच्या पुढील वेतनवाढी मुक्त करण्याच्या अनुषंगाने उचित कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६ मधील तरतुदींन्वये व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय परिवी-२७१५/प्र.क्र.२०३/आठ, दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००६२९१३१७३९५८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2020.06.29 13:36:22 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, शिवाजीनगर, पुणे.

३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)- १, महाराष्ट्र, मुंबई.

४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)- २, महाराष्ट्र, नागपूर.

५. महालेखापाल, लेखापरीक्षा- १, महाराष्ट्र, मुंबई.

६. महालेखापाल, लेखापरीक्षा- २, महाराष्ट्र, नागपूर.

७. श्री. सतीश देविदासराव उमरीकर, सेवानिवृत्त सहसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (संचालनालयामार्फत)

८. निवडनस्ती (कार्यासन, पापु-१५).